सन २०२२-२३ या आर्थिक वर्षाकरीता
वनमहोत्सव (२४०६ ८५५१) लेखाशीर्षांतर्गत
अनुदान वितरण करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः सावि-२०२२/प्र.क्र.६१/फ-११**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : २३ मार्च, २०२३

**वाचा:-**

१) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं -२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३, दि. ०४.०४.२०२२.
२) प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे क्रमांक कक्ष-१/पी/यो/नबाप्र/प्र.क्र.६५/२७७/२०२२-२३, दि. १९.०८.२०२२.
३) प्रधान मुख्य वनसंरक्षक (सामाजिक वनीकरण), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे क्रमांक कक्ष-१/ योजना/ प्र.क्र.१९/५४७/२०२२-२३, दिनांक २८.०७.२०२२.
४) महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र.: सावि-२०२२/प्र.क्र.६१/फ-११, दि. २६.०८.२०२२.
५) महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र.: सावि-२०२२/प्र.क्र.६१/फ-११, दि. ११.१०.२०२२.
६) महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र.: सावि-२०२२/प्र.क्र.६१/फ-११, दि. १४.११.२०२२
७) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं -२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३, दि.०८.०२.२०२३
८) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं -२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३, दि.१६.०३.२०२३

**प्रस्तावना :-**

वनमहोत्सव योजनेसाठी मागणी क्र. सी-०७-२४०६ वनीकरण व वन्यजीवन (११)(३४) वन महोत्सव (२४०६८५५१) या लेखाशिर्षांतर्गत सन २०२२-२३ करिता खालीलप्रमाणे नियतव्यय अर्थसंकल्पित करण्यात आलेला आहे:-

| | | | | (रु. लाखात) |
|---|---|---|---|---|
| **वन महोत्सव** | **०२-मजूरी** | **२१-पुरवठा व सामग्री** | **२६-जाहिरात व प्रसिध्दी** | **एकूण** |
| अर्थसंकल्पीय निधी | ९९५.९० | ९९५.९० | ८.२० | २०००.०० |

२. वित्त विभागाच्या संदर्भ क्र. ८ येथील दि.१६.०३.२०२३ रोजीच्या शासन परिपत्रकान्वये, वित्तिय वर्ष सन २०२२-२३ करिता सुधारित अंदाजाच्या मर्यादेत निधी वितरणाची मर्यादा निश्चित करण्यात आली आहे व त्यानुसार अर्थसंकल्पीय अंदाज, वाटप आणि संनियत्रण प्रणालीवर (बीम्स) वितरीत करण्यास सहमती देण्यात आली आहे.

३. प्रधान मुख्य वनसरंक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी संदर्भ क्र. २ च्या पत्रान्वये वन महोत्सव (२४०६८५५१) या लेखाशिर्षांतर्गत ०२-मजूरी या सविस्तर शिर्षांतर्गत रु. १६०५.१९ लक्ष व २१ -पुरवठा व सामुग्री या सविस्तर शिर्षांतर्गत रु. ४६४.०५ लक्ष असे एकूण रू.

२०६९.२४ लक्ष रकमेचा चालू बाब प्रस्ताव सादर केलेला असून, सन २०२२-२३ करीता मंजूर नियतव्ययाच्या अनुषंगाने अनुदान उपलब्ध करुन देण्याची विनंती करण्यात आली आहे. त्यानुसार उपरोक्त संदर्भ क्र. ४, ५ व ६ वरील शासन निर्णयान्वये, सदर योजनेकरिता ०२- मजूरी या उद्दिष्टांतर्गत रु. ४८७.९९ लक्ष व २१- पुरवठा व सामुग्री या उद्दिष्टांतर्गत रु. ३४८.५६ लक्ष असा एकूण रु. ८३६.५५ लक्ष निधी वितरीत करण्यास मान्यता देण्यात आली आहे.

४. वित्त विभागामार्फत अर्थसंकल्पिय अंदाज, वाटप आणि संनियंत्रण प्रणालीवर वन महोत्सव (२४०६ ८५५१) या योजनेंतर्गत सुधारित अर्थसंकलपीत रकमेच्या मर्यादेत निधी वितरीत करण्यात आलेला आहे. सबब, सदर योजनेंतर्गत निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय :-

सामाजिक वनीकरण विभागामार्फत राबविण्यात येणाऱ्या "वन महोत्सव (२४०६ ८५५१)" या योजनेकरिता सन २०२२-२३ या वित्तीय वर्षात ०२-मजूरी व २१-पुरवठा व सामुग्री या सविस्तर शिर्षांतर्गत सुधारित अर्थसंकल्पित अंदाजानुसार उपलब्ध असलेला व पुढील तक्त्यात नमूद रु.११५५.२५ लक्ष (अक्षरी रुपये अकरा कोटी पंचावन्न लक्ष पंचविस हजार मात्र) इतका निधी वितरित करण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

(रु. लाखात)

| अ.क्र. | योजनेचे नाव | उद्दिष्ट | निधी वितरणास मान्यता |
|---|---|---|---|
| १ | **वन महोत्सव २४०६ ८५५१** | ०२-मजूरी | ५०७.९१ |
| | | २१- पुरवठा व सामुग्री | ६४७.३४ |
| | | एकूण | ११५५.२५ |

२. सदर निधी नियंत्रक अधिकारी म्हणून प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख),महाराष्ट्र राज्य, नागपूर यांच्याकडे सुपूर्द करण्यात येत आहे. या योजनेंतर्गत घ्यावयाच्या कामाची अंमलबजावणी कृती आराखड्याप्रमाणे, विहित कार्यपध्दतीनुसार, विहीत अटी व शर्तीनुसार आणि ठरविलेल्या मुदतीत करण्याबाबत दक्षता घ्यावी. याबाबत सविस्तर मार्गदर्शक सूचना क्षेत्रीय अधिकाऱ्यांना द्याव्यात आणि अंमलबजावणीबाबत वेळोवेळी आढावा घ्यावा. मंजूर निधीपेक्षा जास्त खर्च होणार नाही, याची नियंत्रक अधिकाऱ्यांनी दक्षता घ्यावी.

३. प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), नागपूर हे वर्ष २०२२-२३ मध्ये सदर योजनेंतर्गत वितरीत केलेल्या निधीबाबत उपयोगिता प्रमाणपत्र ७ दिवसांत शासनास सादर करतील.

४. सदर निधी वितरित करण्यापूवी प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी सदर योजनेसाठी सन २०२२-२३ करीता वितरित केलेला निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणाली व्यतिरिक्त अन्यत्र ठिकाणी वळती केला नसल्याची खात्री करावी.

५. सदर निधी खर्च करताना वित्त विभागाच्या संदर्भ क्रमांक १, ७ व ८ येथील शासन परिपत्रकातील तरतूदी व महाराष्ट्र अर्थसंकल्पीय नियम पुस्तिका, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका यामध्ये उल्लेख केलेल्या तरतुदी व वेळोवेळी दिलेल्या सूचनांचे पालन करण्यात यावे.

६. जिल्हानिहाय वितरीत तरतुदीची माहिती व राबविण्यात आलेल्या कार्यक्रमाचा/झालेल्या खर्चाचा तपशील शासनास दरमहा विहित प्रपत्रात सादर करण्यात यावा. तसेच योजनेचे संनियंत्रण प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांच्यामार्फत व्हावे.

७. सदर योजनेअंतर्गत होणारा खर्च खाली नमूद केलेल्या लेखाशीर्षाखाली सन २०२२-२३ च्या मंजूर अर्थसंकल्पीत निधीतून खर्ची टाकण्यात यावा.

**"मागणी क्र.सी-०७**
**२४०६, वनीकरण व वन्यजीवन,**
**राज्य योजनेंतर्गत योजना (११)(३४) वनमहोत्सव योजनंतर्गत (राज्य) (२४०६ ८५५१).**
**०२- मजूरी , २१- पुरवठा व सामुग्री**

८. सदर शासन निर्णय, वित्त विभागाचे दि. १६.०३.२०२३ रोजीचे परिपत्रक तसेच वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. विअप्र/२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२, दि. १७.०४.२०१५ अन्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

९. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०३२४१२४८१६४६१९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

INGALE VINAYAK BALASAHEB

Digitally signed by INGALE VINAYAK BALASAHEB
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT,
2.5.4.20=4282a00b0a0507f339edd9409eebc43f466c57e6ec219f022cb4d8e9d79999ec, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=B9DD74802C0E9E87CDD582D1AEA8DC4506C60DEA869DFE0B71557BF4A56623D7, cn=INGALE VINAYAK BALASAHEB
Date: 2023.03.24 12:52:49 +05'30'

**( विनायक बा. इंगळे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक, (वनबल प्रमुख ),महाराष्ट्र राज्य ,नागपूर.
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३. प्रधान मुख्य वनसंरक्षक (सामाजिक वनीकरण), महाराष्ट्र राज्य, पुणे.
४. महालेखापाल, (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १ व २ , मुंबई व नागपूर.

५. जिल्हा कोषागार अधिकारी, छत्रपती संभाजीनगर
६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई-३२.
७. निवासी परिक्षा लेखा अधिकारी,मुंबई
८. वित्त विभाग, व्यय-१०, अर्थसंकल्प-०६ मंत्रालय, मुंबई-३२
९. कार्यासन अधिकारी, ब-१ व फ-२,महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१०. निवडनस्ती फ-११.